**नागपूर मध्यवर्ती कारागृहामधील विविध बांधकामांच्या खर्चाच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र. जेएलएम-०१२४/प्र.क्र.२८/तुरुंग-२,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ६ मार्च, २०२५.

**संदर्भ:**

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलडी/नामका/ नकोरु/बांधकाम/प्रमा/६१०६/२४ कक्ष- ६ (३) पुणे-१, दिनांक १९.०७.२०२४.
२. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलडी/नामका/ विकॉक/विस्तारीकरणकरणे/ प्रमा/६५८४/२४ कक्ष- ६ (३) पुणे-१, दिनांक ५.८.२०२४.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम भाग-२, दिनांक २०.९.२०१९.
४. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५.९.२०१९.

**प्रस्तावना:**

नागपूर कारागृहातील बांधकामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्यासंदर्भात संदर्भिय क्र.१ व २ येथील पत्रांन्वये अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडून प्रस्ताव शासनास प्राप्त झाले आहेत. सदर अंदाजपत्रके संबंधित उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग यांनी तयार केले असून त्यास मुख्य अभियंता, नागपूर यांनी तांत्रिक मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन या बांधकामांच्या खर्चाच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

नागपूर मध्यवर्ती कारागृहातील खालील विवरणपत्रात नमूद बांधकामांच्या खर्चाच्या अंदाजपत्रकांना या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | **कामाचे नाव** | **रक्कम** आकडे रुपये मध्ये |
|---|---|---|
| १ | नागपूर मध्यवर्ती कारागृह परिसरात नवीन कोर्टरुमचे बांधकाम करणे | रु.२,०१,९८,६६१/- |
| २ | नागपूर मध्यवर्ती कारागृह येथील व्हिडीओ कॉन्फरंन्स कक्षाचे विस्तारीकरण करणे | रु.२,२२,६२,११२/- |

२. या साठी होणारा खर्च मागणी क्र. एच-८, ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च (४०५९ ०९१२) (०१) (१०१)/ (११) (०१) ( तुरुंग) ( योजनांतर्गत योजना), ५३- मोठी बांधकामे, या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक २०.९.२०१९ चे परिशिष्ट "अ" वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.१ नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४(१) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या पूर्ण अधिकारानुसार सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३०६११२४५६७४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SEEMA TUSHAR SAWANT

Digitally signed by SEEMA TUSHAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=15a6230fe20fd947aa83047f5deb85c95659ceb098e76eb25dd802b0518e7d63, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9ED89E6C00B3FD549E02FB85DFE0767F96018A29CCAC79EC62AAFD247DECECE8, cn=SEEMA TUSHAR SAWANT
Date: 2025.03.06 11:25:57 +05'30'

**( सीमा तु. सावंत )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर,
३. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव (अ. व सु.) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक,कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. कारागृह उपमहानिरिक्षक, पूर्व विभाग, महाराष्ट्र राज्य,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
११. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर,
१२. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर,
१३. अधिक्षक, नागपूर मध्यवर्ती कारागृह, नागपूर,
१४. निवड नस्ती, तुरुंग -२ कार्यासन.